राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना सन २०१७-१८ पर्यंतच्या कर्जाची व्याजासह परतफेड सन २०१८-१९ च्या मंजुर अनुदानातून करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-१३१८/प्र.क्र.१८२/९-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १८ सप्टेंबर, २०१८

वाचा :-

१. उपनिर्देशक (वित्त) रा.स.वि.नि., नवी दिल्ली यांचे क्र.एनसीडीसी ए ॲन्ड सी/नऊ(१)/ इआरईपी/०९ /२६३९, दि.१४.०६.२०१८.
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.०५.२०१६

प्रस्तावना :-

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागांतर्गत राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत विविध योजनांतर्गत राज्य शासन सहकारी संस्थाना प्रकल्पांच्या उभारणीकरीता त्या त्या योजनेच्या मंजूर वित्तीय आराखडयानुसार शासकीय भागभांडवल तसेच कर्ज उपलब्ध करुन देते. राष्ट्रीय सहकार विकास निगमामार्फत या योजनेअंतर्गत राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. सन २०१७-१८ पर्यंत राज्य शासनास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केलेल्या कर्जापैकी, परतफेडीकरीता पात्र कर्जातील मुद्दलाची व मंजूर कर्जावरील व्याजाच्या देय हप्त्यांची परतफेड करण्याकरीता राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने संदर्भाधिन दि.१४.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास सूचित केले आहे. सदर पत्रानुसार सन २०१७-१८ पर्यंत राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या, कर्जापैकी मुद्दल रु.३७,५७,८९,५७०/- व व्याज रु.१०,९२,१७,३६२/- असे एकूण रु.४८,५०,०६,९३२/- एवढी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास निगमास अदा करण्याची विनंती शासनास केली आहे. एन.सी.डी.सी.ने प्रस्तावित केल्यानुसार दि.२०.०९.२०१८ पूर्वी रक्कम अदा केल्यास व्याजावर रु.९२,२२,८२०/- इतक्या रकमेची सूट मिळणार आहे. म्हणजेच रु.३७,५७,८९,५७०/- मुद्दल व रु.९,९९,९४,५४२/- इतकी व्याजाची रक्कम अशी एकूण रु.४७,५७,८४,११२/- इतकी रक्कम एनसीडीसीला दि.२०.०९.२०१८ पर्यंत अदा करणे आवश्यक आहे. म्हणून रुपये रु.४७,५७,८४,११२/- (कर्जाची मुद्दल रुपये ३७,५७,८९,५७० + व्याज रुपये ९,९९,९४,५४२/-) इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

२. कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाची दक्षता या विषयाबाबत दि.१०.०५.२०१६ रोजी वित्त विभागाने परिपत्रक निर्गमित केले असून त्या अनुषंगाने या प्रस्तावासंबंधी माहिती पुढीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार- वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पित रकमेच्या ७०% तरतुदीच्या मर्यादेत निधी वितरण करण्यास विभागास अधिकार आहेत. वितरीत करावयाची विचाराधीन रक्कम ७० % च्या मर्यादेत आहे.

२) मंजूर निधी:- सन २०१८-१९ या वर्षात कर्जाच्या मुद्दलाची परतफेड करण्यासाठी रु.५५.०० कोटी व व्याजासाठी रु.२१.०० कोटी अशी एकूण रु.७६.०० कोटी रकमेची तरतूद करण्यात आली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी सदर लेखाशिर्षांतर्गत कोणताही खर्च झालेला नाही.

४) विचाराधीन लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) ५ ते ८ येथील बाबी लागू नाहीत.

राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना रु.४७,५७,८४,११२/- इतकी रक्कम अदा करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

राज्यातील सहकार विकासाकरीता राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या वेगवेगळया योजनांसाठी राज्य शासनास कर्ज मंजूर केले होते. सदरच्या कर्जाची मुद्दल रु.३७,५७,८९,५७०/-(रुपये सदोतीस कोटी सत्तावन्न लाख एकोणनव्वद हजार पाचशे सत्तर फक्त) व त्यावरील व्याजाची रक्कम रु.९,९९,९४,५४२/- (रुपये नऊ कोटी नव्यान्नव लाख चौ-यान्नव हजार पाचशे बेचाळीस फक्त) अशी एकूण रु.४७,५७,८४,११२/- (रुपये सत्तेचाळीस कोटी सत्तावन लाख चौऱ्याऐंशी हजार एकशे बारा फक्त) इतकी रक्कम सन २०१७-१८ पर्यंत परतफेडीच्या हप्त्यापोटी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**२.** सदर खर्च चालू आर्थिक वर्षात (२०१८-१९) खालील लेखाशिर्षांतर्गत करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा-

**कर्ज -** रु.३७,५७,८९,५७०/- (रुपये सदोतीस कोटी सत्तावन्न लाख एकोणनव्वद हजार पाचशे सत्तर फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-४**

मुख्य लेखाशिर्ष

६००३ राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण

(१०८) राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे

(००)(०१) राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे

**(६००३ ०२४२)**

भारित-५६, कर्जाची परतफेड

**व्याज-** रु.९,९९,९४,५४२/- (रुपये नऊ कोटी नव्यान्नव लाख चौ-यान्नव हजार पाचशे बेचाळीस फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-१**

मुख्य लेखाशिर्ष

२०४९ व्याज प्रदाने

०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज

२०० देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज

(०२)(०१) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज

**(२०४९ १०४३)**

भारित-४५, व्याज

३. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना मंजूरी केलेली उपरोल्लिखित रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन निगमाला त्याचे वितरण करण्यासाठी श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच, श्री.का.गो.वळवी, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोल्लेखित रक्कम RTGS/NEFT सुविधेव्दारे राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना अदा करावयाची असून त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे-

| | |
|---|---|
| Name of the account | National Cooperative Development Corporation |
| Name of the Bank | State Bank of India |
| Name of the Branch | Commercial Branch, Nehru Place, Delhi |
| Account No. | ३२१६४०५२८७४ |
| IFSC Code | SBIN ०००४२९८ |

५. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याची पोच महाराष्ट्र शासनास नोंदणीकृत डाकेने/ई मेलव्दारे मुद्रांकित पावती पाठवावी.

६. संदर्भाधिन क्र.२ येथील वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील अटींची तसेच, परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील प्रस्तावाला लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे (परिशिष्टातील अनुक्रमांक ७ येथील अट वगळून) प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४८२/२०१८/व्यय-२, दि.१२.०९.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.२१३/अर्थ-१३/१८,दि.१५.०९.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांचा संकेतांक क्रमांक २०१८०९१९१०१४२३५२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Shilpa Dilip Gaikwad
Date: 2018.09.19 10:19:09 +05'30'

**(शि. दि. गायकवाड)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव (सहकार/पणन/वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२ उप सचिव/वि.का.अ.(पणन/पतसंस्था/साखर/सूतगिरण्या/वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३ अवर सचिव/ कक्ष अधिकारी(२-स/३-स/१-स/१६-स/१७-स/२४-स/टेक्स-१अ/ब, टेक्स-२ /टेक्स-३ /टेक्स-४), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

४ कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-.

५ कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर

७ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

८ निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

९ सहकार, आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

१० पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

११ साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

१२ संचालक, वस्त्रोद्योग , महाराष्ट्र राज्य, नागपूर

१३ सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा) नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मादाम कामा रोड, मंत्रालयासमोर, मुंबई -३२

१४ संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४ सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौजखास नवी दिल्ली ११०००१

१५ प्रादेशिक उपसंचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५ बी.जे.रोड, पुणे

१६ निवडनस्ती (९-स)